**केंद्र शासनाचा माहितीचा अधिकार अधिनियम २००५ मधील तरतूदीनुसार सार्वजनिक बांधकाम विभाग (खुद्द), मंत्रालय मध्ये सहायक जन माहिती अधिकारी, जन माहिती अधिकारी तसेच प्रथम अपीलीय प्राधिकारी घोषित करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन आदेश क्रमांक : केंमाअ २०१८/प्र.क्र.१४९/२०१८/प्रशासन-३**

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

दिनांक : १८ नोव्हेंबर, २०१९.

**संदर्भ :-** १) सामान्य प्रशासन विभागाचे शासन परिपत्रक क्र.केंमाअ २००५/प्र.क्र.१९०/०५/५, दि.१८.६.२००५.

२) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन आदेश क्र.केंमाअ २००५/प्र.क्र.१०७/प्रशा-३, दि.७.७.२००५.

३) सामान्य प्रशासन विभागाचे शासन परिपत्रक क्र.केंमाअ २००५/प्र.क्र.२९३/०५/५, दि.६.९.२००५

४) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन आदेश क्र.केंमाअ २००५/प्र.क्र.१०७/प्रशा-३, दि.१९.९.२००५.

## शासन निर्णय :-

सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१८.६.२००५ रोजीच्या शासन परिपत्रकातील परि.४ मधील निदेशानुसार, या विभागाने सार्वजनिक बांधकाम विभाग (खुद्द), मंत्रालय मधील सहाय्यक जन माहिती अधिकारी, जन माहिती अधिकारी व अपीलीय प्राधिकारी घोषित केले आहेत. तद्नंतर, त्यानुषंगाने आवश्यकतेनुसार वेळोवेळी यासंदर्भात आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

**आता, प्रशासकीय कामकाजास्तव यापूर्वी विभागाने सहायक जन माहिती अधिकारी, जन माहिती अधिकारी व अपीलीय प्राधिकारी घोषित करण्यासंदर्भात निर्गमित केलेले सर्व आदेश याव्दारे अधिक्रमित करण्यात येत आहेत व आदेशाच्या दिनांकापासून, सार्वजनिक बांधकाम विभाग (खुद्द), मंत्रालय यांच्या अधिनस्त असलेल्या सर्व कार्यासनांतील सहायक जन माहिती अधिकारी, जन माहिती अधिकारी तसेच त्यावरील प्रथम अपीलीय प्राधिकारी यांना खालीलप्रमाणे घोषित करण्यात येत आहेत :-**

| अ.क्र. | संवर्गाचे नाव | घोषित केलेले पद |
|---|---|---|
| १ | संबंधित विषयाचे कामकाज हाताळणारा सहायक कक्ष अधिकारी (Dealing ASO) | सहायक जन माहिती अधिकारी |
| २ | कार्यासन अधिकारी | जन माहिती अधिकारी |
| ३ | अवर सचिव | प्रथम अपीलीय प्राधिकारी |

तथापि, विभागातील रोख कार्यासन व लेखापरीक्षा कार्यासन यांचेकरीता प्रथम अपीलीय प्राधिकारी अनुक्रमे अवर सचिव ( प्रशा) व अवर सचिव (अर्थ) हे कामकाज हाताळतील.

येथे असेही नमूद करण्यात येते की, प्रथम अपील वा व्दितीय अपीलांची संख्या मर्यादेत राहण्याच्या दृष्टीने, जन माहिती अधिकारी तसेच प्रथम अपीलीय प्राधिकाऱ्यांनी त्यांच्या वरिष्ठांकडून (सह/उप सचिव) आवश्यकतेनुसार मार्गदर्शन घेऊन माहिती अधिकार अर्ज काळजीपूर्वक व विहित वेळेत हाताळण्याची दक्षता घ्यावी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात येत असून, त्याचा संकेतांक २०१९१११८१७२६०८६०१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Chandrashekhar
Prabhakar Joshi

Digitally signed by Chandrashekhar Prabhakar Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=2c8893d1513ab2ea4a7f8c612a31ac748bd05ab00efd5e22f2d25c9872e36d29,
serialNumber=423be4ff70a89bfc945ec5e481b972d568094459d7ff8219a1f968860a431f89,
cn=Chandrashekhar Prabhakar Joshi
Date: 2019.11.18 17:31:08 +05'30'

**( चंद्रशेखर जोशी )**
सचिव (रस्ते), महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अ.मु.स.(सा.बां.) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
२. सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
३. सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
४. सर्व मुख्य अभियंता, नागपूर/अमरावती/औरंगाबाद/नाशिक/पुणे/कोकण,
५. उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, वांद्रे (पूर्व), मुंबई.
६. मुख्य अभियंता, राष्ट्रीय महामार्ग, कोकण भवन, नवी मुंबई,
७. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, बांधकाम भवन, मुंबई,
८. मुख्य अभियंता (विद्युत), बांधकाम भवन, मुंबई,

सर्व मुख्य अभियंता यांनी यानुषंगाने खाली नमूद केल्यानुसार, जन माहिती अधिकारी तसेच प्रथम अपीलीय प्राधिकारी घोषित करण्यासंदर्भातील आदेश तात्काळ निर्गमित करावेत.

| **अ.क्र.** | **स्तर** | **संवर्गाचे नाव** | **घोषित केलेले पद** |
|---|---|---|---|
| १ | उप विभाग | शाखा अभियंता | जन माहिती अधिकारी |
| | | उप अभियंता | प्रथम अपीलीय प्राधिकारी |
| २ | विभाग | प्रथम लिपिक | जन माहिती अधिकारी |
| | | उप कार्यकारी अभियंता | प्रथम अपीलीय प्राधिकारी |
| ३ | मंडळ | अधीक्षक/विशेष अधीक्षक | जन माहिती अधिकारी |
| | | सहायक अधीक्षक अभियंता | प्रथम अपीलीय प्राधिकारी |
| ४ | प्रादेशिक विभाग | विशेष अधीक्षक | जन माहिती अधिकारी |
| | | सहायक मुख्य अभियंता | प्रथम अपीलीय प्राधिकारी |

९. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
१०. उप संचालक (लेखा), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय,मुंबई ४०० ०३२,
११. सर्व कार्यासन अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
१२. सामान्य प्रशासन विभाग, कार्या.६, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय,मुंबई ४०० ०३२,
१३. कार्यासन प्रशासन-३, संग्रहार्थ/निवडनस्ती.